जोरण लघु पाटबंधारे योजना , ता. दिंडोरी , जि. नाशिक, या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा- २०१४/(२८/२०१४)/ लपा
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १३ जून, २०१८

संदर्भ-

१) शासन निर्णय क्र. लपायो/२००८/१५६४/(५३४/२००८)/खारभुमी मंत्रालय, मुंबई दि. २०.०५.२००९
२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. जा. क्र. गोमपाविम/ तां-५/ जोरण लपा/सुप्रमा/५४१, दिनांक १५/०१/२०१४
३) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. जा. क्र. गोमपाविम/ तां-५/ ३२१२, दिनांक ०४/०४/२०१६
४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. जा. क्र. गोमपाविम/ तां-५/ १३२९, दिनांक १७/०२/२०१७
५) वित्त विभाग ३२-मुंबई ,मंत्रालय ,यांचे पत्र क्रमांक: १) व्यअस-२०१८/प्र.क्र.२७/अर्थसं-२ दिनांक -२७.०२.२०१८.

प्रस्तावना :

जोरण लघु पाटबंधारे योजना , ता. दिंडोरी , जि. नाशिक, ही योजना नाशिक जिल्ह्यातील दिंडोरी तालुक्यातील जोरण गावाजवळील स्थानिक नाल्यावर असुन सदर नाला कादवा नदीचा उपनाला आहे. या योजनेचे सिंचन क्षेत्र २९० हेक्टर आहे. योजनेस संदर्भ क्र. १ अन्वये २००८-०९ च्या रु. ९१९.३९ लक्ष इतक्या किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ अन्वये गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाने १८४१.१५ लक्ष किंमतीचा प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव सन २०१२-१३ दरसूचीनुसार शासनास सादर केला आहे. नियोजन विभाग़ाने उपस्थित केलेल्या मुद्यांच्या अनुपालनासह संदर्भ क्र.४ अन्वये रू. २१४३.३४ लक्ष चा २०१३-१४ दरसूचीवर सुधारित प्रस्ताव शासनास पुनश्च सादर करण्यात आला. बांधकामाचे दरम्यान योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरक, जादा दराची निविदा स्वीकृती, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पनामुळे झालेली वाढ व इतर कारणांमुळे झालेली वाढ इत्यादी मुळे योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे. त्यासाठी सदर प्रस्त्वाव हा व्यय अग्रक्रम समितीपुढे मान्यतेसाठी ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने संदर्भ क्र. ५ अन्वये दि. १५.०२.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत यास मान्यता दिलेली आहे.

शासन निर्णय :

१) आता या निर्णयान्वये जोरण लघु पाटबंधारे योजना , ता. दिंडोरी , जि. नाशिक या योजनेस एकूण अंदाजित खर्च रुपये २१४३.३४ लक्ष (रु. दोन हजार एकशे त्रेचाळीस लक्ष चौतीस हजार फक्त )या किंमतीकरिता प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. [कामासाठी एकूण रूपये २०००.०४ लक्ष व अनुषंगिक खर्च रूपये १४३.३० लक्ष]. अंदाजपत्रकात प्रत्यक्ष झालेला खर्च व उर्वरित कामासाठी सन २०१३-२०१४ वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशीर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्ट “अ” मध्ये जोडला आहे.

२) सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

२.१ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयी करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता असल्याचे गृहीत धरता येणार नाही.

२.२ या प्रकल्पाबाबत चालु असलेल्या अथवा प्रस्तावित विभागिय चौकशीची कार्यवाही पुढे चालु ठेवावी. प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

२.३ आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

२.४ प्रगतीपथावरील निविदांची कामे प्रधान्याने पूर्ण करण्यात यावीत. पाणीसाठ्याचा सिंचनाकरीता जास्तीत जास्त लाभ होईल अशा प्रकारे उर्वरित कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा व त्यानुसार कामे/ निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

२.५ प्रकल्पाचे काम जून २०१९ पर्यंत पूर्ण करण्यात यावे.

२.६ जलसंपदा विभाग शासन परिपत्रक दि. १०.०८.२०११ मधील परि. ३ च्या तरतुदीनुसार कालवे रद्द करून बंधारे बांधण्याच्या प्रस्तावास शासन स्तरावरून मान्यता घेणे आवश्यक होते याबाबत विभाग़ाने केलेला खुलासा समर्थनीय नाही. संबंधितावर जबाबदारी निश्चित करण्यात यावी. तसेच सदर योजनेचे ढोबळमानाने सर्वेक्षण केल्याचे दिसून येत आहे याबाबत संबंधितावर जबाबदारी निश्चित करावी.

३. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०- सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणुका (००) (०३) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ४९२७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ९३ / १४३४, दि.१०.०४.२०१७, तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २४६/व्यय-१२, दि.२७.१०.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व्यय अग्रक्रम समितीने दि. १५/०२/२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार व संदर्भ क्रमांक ५ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यतेच्या नोंदवहीमध्ये १८० अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३१७१८४१३५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र :- परिशीष्ट - अ

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:22:42 +05'30'

**(म. ई. धरणे)**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.

३. सर्व मा. मंत्री /मा. राज्यमंत्री , महाराष्ट्र राज्य मंत्रालय मुंबई.

४. विरोधी पक्ष नेते विधान परिषद / विधानसभा
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
८. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
९. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१०. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश,नाशिक
११. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. जिल्हाधिकारी, नाशिक
१३. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, ,अहमदनगर
१४. अर्थशाखा १/२ जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१६. लपा , संग्रहार्थ.

परिशीष्ट- "अ"

शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा- २०१४/(२८/२०१४)/ लपा मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.तारीख: १३/६/२०१८

चे सहपत्र

जोरण लघु पाटबंधारे योजना , ता. दिंडोरी , जि. नाशिक या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता .

उपशिर्षनिहाय तरतूदी (रक्कम लक्ष मध्ये)

| अ.क्र. | तपशिल | मूळ प्र.मा. | प्रथम सुप्र.मा. | वाढीची रक्कम रु. लक्ष |
|---|---|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक | १.५० | २.६५ | १.१५ |
| २ | ब- जमीन | १५३.८८ | ५६७.०९ | ४१३.२१ |
| ३ | क- कामे, धरण, सांडवा | ४९५.९७ | ८७०.६६ | ३७४.६९ |
| ४ | डी- विमोचक | ३१.७८ | ९४.८९ | ६३.११ |
| ५ | ई - प्रपात | ०.६० | - | (- ०.६०) |
| ६ | फ- आर एच टी कामे | ६६.३४ | - | (- ६६.३४ ) |
| ७ | जी - पुल | १०.५० | - | (- १०.५०) |
| ८ | के- इमारती | २.०० | - | (- २.००) |
| ९ | एल - मातीकाम | ७०.८२ | - | (- ७०.८२) |
| १० | एम - वृक्षारोपण | ०.५० | १.७९ | १.२९ |
| ११ | ओ- संकिर्ण | १.२३ | १.१२ | - ०.१२ |
| १२ | पी- परिरक्षण खर्च | १.२३ | ४.८५ | ३.६२ |
| १३ | आर- दळणवळण | २.०० | ५२.७३ | ५०.७३ |
| १४ | अतिरिक्त स्वामीत्व धन | - | १५४.९१ | १५४.९१ |
| १५ | साठवण बंधारे | - | २४९.३४ | २४९.३४ |
| १६ | वितरिका | ७.९० | - | - ७.९० |
| | **एकूण** | **८४६.२७** | **२०००.०४** | ११५३.७७ |
| १७ | अनुषंगिक खर्च | ७३.१२ | १४३.३० | ७०.१८ |
| | **एकूण एकत्रित** | **९१९.३९** | **२१४३.३४** | १२२३.९५ |

( रु. दोन हजार एकशे त्रेचाळीस लक्ष चौतीस हजार फक्त )

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र २९० हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा २५४२.७२ स.घ.मी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ८४२९३/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.१४ > १

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:22:53 +05'30'

**( म. ई. धरणे )**

शासनाचे उप सचिव